पुणे महानगर मेट्रो रेल प्रकल्प टप्पा-१ ची विस्तारीत मार्गिका स्वारगेट ते कात्रज (कॉरिडोर-२ए) प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पीआरडी-३३२१/प्र.क्र.७०/नवि-७,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : १२ मे, २०२२.**

**प्रस्तावना :-**

पुणे महानगर प्रदेश क्षेत्र हे देशातील ८ व्या क्रमांकाचे महानगर प्रदेश क्षेत्र मोठे क्षेत्र असून पुणे शहर महाराष्ट्र राज्यातील दुसरे मोठे शहर आहे. पुणे, पिंपरी चिंचवड शहरांमध्ये गेल्या दोन दशकांपासून लोकसंख्या आणि रोजगारामध्ये प्रचंड वाढ होत असून सदरची शहरे शक्य तितक्या विस्तीर्ण मर्यादेपर्यंत पसरत आहेत. या शहरांत मोठ्या संख्येने शैक्षणिक संस्था, नामांकित माहिती तंत्रज्ञान कंपन्या, उत्पादन उद्योग स्थापन झाल्यामुळे पुणे शहर देशामधील आघाडीचे शैक्षणिक, औद्योगिक, आयटी हब म्हणून नावारुपास आले आहे. यामुळे पुणे शहर हे देशातील महत्वाचे आर्थिक केंद्र बनले आहे.

पुणे, पिंपरी चिंचवड शहरातील प्रवाशांसाठी शाश्वत, सुरक्षित, जलद व आरामदायक अशी मेट्रो रेल प्रणाली आधारित नागरी वाहतूक सेवा उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्प टप्पा-१ मधील मार्गिका क्रमांक १ (पिंपरी-चिंचवड ते स्वारगेट, लांबी १६.५८९ कि.मी.) व मार्गिका क्रमांक २ (वनाज ते रामवाडी, लांबी १४.६६५ कि.मी.) या रु.११४२० कोटी खर्चाच्या उन्नत व अंशत: भुयारी मेट्रो प्रकल्पाची अंमलबजावणी महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. (महामेट्रो) या केंद्र व राज्य शासनाचा ५०:५० समभाग असलेल्या विशेष हेतू वाहन कंपनीकडून करण्यात येत असून आतापर्यंत सुमारे ६५ टक्के भौतिक प्रगती साध्य झाली आहे. पिंपरी चिंचवड ते स्वारगेट मेट्रो रेल मार्गिकेचा निगडी पर्यंत विस्तार करण्याबाबत सर्वसामान्य जनता, लोकप्रतिनिधी व इतर लाभधारकांकडून मोठया प्रमाणात करण्यांत येत असलेली मागणी विचारात घेऊन शासनाने पी.सी.एम.सी. ते निगडी (कॉरिडोर क्र.१ए) (लांबी ४.४१ कि.मी. व ३ उन्नत स्थानके) विस्तारीत मार्गिकेवर महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन मार्फत मेट्रो रेल सेवा उभारण्यास मान्यता दिली आहे. सद्यस्थितीत सदर विस्तारीत प्रकल्पाचा प्रस्ताव केंद्र शासनाच्या मंजूरीच्या प्रक्रीयेत आहे.

पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्प टप्पा-१ मधील मार्गिका क्रमांक १ आणि २ यांच्या उभारणीस मान्यता देण्याच्या प्रक्रीयेमध्ये मा. मंत्रीमंडळाने यापूर्वी सन २०१३ मध्ये “स्वारगेट ते कात्रज” या वाढीव मार्गिकेस तत्वतः मान्यता देण्यात आलेली आहे. विविध लोकप्रनिधी, पुणे महागरपालिकेचे सदस्य, इतर लाभधारकांकडून करण्यात येत असलेली मागणी विचारात घेऊन आयुक्त, पुणे महानगरपालिका यांनी स्वारगेट ते कात्रज मार्गावर मेट्रो सेवा विकसीत करण्याकरिता मेट्रो प्रकल्पाचा सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याबाबत महामेट्रोला विनंती केले होती. त्यानुसार महामेट्रोने मेसर्स सिस्ट्रा या सल्लागार कंपनीमार्फत स्वारगेट ते कात्रज या भूमिगत मेट्रो रेल मार्गिकेचा सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करून

घेतला आहे. पुणे महानगरपालिका सभेने ठराव क्र.४७८, दि.२२.०९.२०२१ अन्वये स्वारगेट ते कात्रज या भुयारी मेट्रो मार्गिकेचे काम करणेसाठी जमिनीची किंमत व पुनर्वसन खर्चाची रक्कम व पुणे महानगरपालिकेच्या आर्थिक सहभागापोटी एकूण प्रकल्प खर्चाच्या १५ % रक्कम प्रकल्पासाठी खर्च करण्याबाबत ठराव केला आहे. त्यानुषंगाने महामेट्रोने सदर प्रकल्पाचा ३६५०.७८ कोटी पूर्णत्व खर्चाचा सविस्तर प्रकल्प अहवाल शासनास सादर केला असून प्रकल्प प्रस्तावास मान्यता देणेबाबत शासनास विनंती केली आहे. त्यानुषंगाने सदर प्रकल्पाच्या प्रस्तावास राज्य शासनाकडून मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहेः-

**०२. शासन निर्णय :-**

पुणे महानगर मेट्रो रेल प्रकल्प टप्पा-१ ची विस्तारीत मार्गिका स्वारगेट ते कात्रज (कॉरिडोर-२ए) या प्रकल्पाचे महत्व लक्षात घेता पुणे महानगरपालिकेने महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. मार्फत सादर केलेल्या सदर मेट्रो रेल प्रकल्पाच्या प्रस्तावास खालील प्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :-

१) पुणे महानगर मेट्रो रेल प्रकल्प टप्पा-१ ची विस्तारीत मार्गिका स्वारगेट ते कात्रज (कॉरिडोर-२ए) या ५.४६४ कि.मी. लांबी, ३ स्थानके असलेल्या रु. ३६६८.०४ कोटी प्रकल्प पूर्णत्व खर्चाच्या पूर्णत: भूयारी मेट्रो रेल्वे प्रकल्पाची महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. (महामेट्रो) मार्फत अंमलबजावणी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२) स्वारगेट ते कात्रज मेट्रो रेल प्रकल्पासाठी मेसर्स सिस्ट्रा यांनी अंदाजित केलेल्या सोबतच्या **परिशिष्ट क्र.१ व २** येथील तपशीलात नमूद रु.३६६८.०४ कोटी इतक्या प्रकल्प पूर्णत्व खर्चाच्या प्रकल्पाची सोबतच्या **परिशिष्ट क्र.३** येथील वित्तीय सहभागाद्वारे निधी उभारुन अंमलबजावणी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३) सदर प्रकल्पासाठी पुणे महानगरपालिकेने रु.४५०.९५ कोटीचे अनुदान आणि भूसंपादन, पूनर्वसन व पूनर्वसाहत व बांधकाम कालावधी दरम्यानचे व्याज याकरिता रु.२०४.१४ कोटी असे एकूण रु.६५५.०९ कोटी इतके वित्तीय सहाय्य महामेट्रोला उपलब्ध करून देण्याबाबत पुणे महानगरपालिकेला निदेश देण्यात येत आहेत.

४) सदर प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनाचे कर व शुल्क यांवरील खर्चासाठी रु.४४०.३२ कोटी इतकी रक्कम राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून देण्यास मान्यता देण्यात यावी. सदर दुय्यम कर्जाची परतफेड ही प्रकल्पासाठी घेण्यात येणाऱ्या मुख्य कर्जाची परतफेड केल्यानंतर महामेट्रोने करण्याबाबत महामेट्रोला निर्देश देण्यात येत आहेत.

५) सदर प्रकल्पासाठी केंद्र शासनाकडून रु.३००.६३ कोटी चे अनुदान मिळविण्याकरिता केंद्रशासनाकडे विनंती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

६) सदर प्रकल्पासाठी केंद्र शासनामार्फत निधी प्राप्त करुन घेण्यासाठी पत्रव्यवहार करण्यास व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल्वे कॉर्पोरेशन लि. यांना प्राधिकृत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

७) सदर प्रकल्पाकरिता द्विपक्षीय/बहुपक्षीय वित्तीय संस्थेमार्फत अल्प व्याज दराचे कर्ज घेण्यास, सदर कर्जाची मुद्दल, व्याज व इतर शुल्क यांचा कोणताही भार राज्यशासनावर येणार नाही या अटीवर, महामेट्रो यांना प्राधिकृत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

८) सदर प्रकल्पाच्या सोबतच्या **परिशिष्ट-३** येथील वित्तीय सहभाग आराखड्यानुसार राज्यशासनाने सोसावयाच्या निधीपेक्षा अधिकचा निधी सदर प्रकल्पास उपलब्ध करुन देण्यात येणार नाही, याची नोंद महामेट्रो व पुणे महानगरपालिका यांनी घ्यावी.

९) सदर प्रकल्पाकरिता द्विपक्षीय/बहुपक्षीय वित्तीय संस्थेमार्फत घेतल्या जाणाऱ्या कर्जाच्या मुद्दलाची परतफेड तसेच व्याजाची परतफेड याची जबाबदारी महामेट्रोची राहील. त्यामुळे शासनावर कोणताही अतिरिक्त भार येणार नाही याची खबरदारी महामेट्रोने घ्यावी.

१०) सदर प्रकल्पाचे भाडे टप्पे व दराप्रमाणे पुढीलप्रमाणे सुरुवातीचे भाडेदर ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अंतर (कि.मी.) | ०-२ | २-४ | ४-६ | ६-९ | ९-१२ | १२-१५ | १५-१८ | १८-२१ | २१-२४ | २४-२७ | २७-३० | ३० पेक्षा अधिक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| भाडे (रु.) | २२ | २६ | ३१ | ४६ | ४७ | ५२ | ५५ | ६० | ६४ | ६७ | ७५ | ८० |

उल्लेखीत भाडेदरांत मेट्रो रेल प्रकल्प सुरू करण्यापूर्वी प्रकल्पाची वित्तीय व्यवहार्यता तपासून गरज भासल्यास, शासनाच्या पूर्व मान्यतेने, आवश्यक ते बदल करण्यास महामेट्रोला निर्देश देण्यात येत आहेत. मेट्रो कायद्यानुसार भाडेदरात पुढील बदल करण्याचे अधिकार भाडे निर्धारण समितीला (Fare Fixation Committee) आहेत, याची नोंद घेण्याबाबत संबंधितांना सूचित करण्यात येत आहे.

११) सदर मेट्रो प्रकल्पाची अंमलबजावणी "मेट्रो कायदा २००९ (सुधारित)" नुसार करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१२) सदर प्रकल्प "निकडीचा सार्वजनिक प्रकल्प" व "महत्वपूर्ण नागरी वाहतूक प्रकल्प" म्हणून घोषित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१३) सदर मेट्रो रेल्वे प्रकल्प वेळेवर पूर्ण करण्यासाठी मेट्रो रेल्वे स्थानक सुविधांकरीता व तसेच कारडेपोकरीता आवश्यक असलेल्या खाजगी जमीनी मेट्रो रेल्वे अधिनियम, २००९/ महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम, १९६६ /नविन केंद्रीय भूसंपादन व पूनर्वसन व पूनर्वसाहत अधिनियम, २०१३ अंतर्गत अथवा विकास हक्क/विकास हक्क हस्तांतरण यांचे माध्यमातून करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१४) सदर मेट्रो प्रकल्पाच्या मार्गिकेमध्ये तसेच मेट्रो स्थानकांमध्ये गरज वाटल्यास किरकोळ बदल करण्यास, प्रकल्पाच्या व्याप्तीमध्ये अथवा प्रकल्पाच्या खर्चात वाढ होत असल्यास त्यास शासनाची पूर्व मान्यता घेण्याच्या अटीवर, महामेट्रोला प्राधिकृत करण्यात येत आहे.

१५) सदर प्रकल्पाची अंदाजित किंमत, प्रकल्पामधुन मिळणारा परतावा याकरिता प्रकल्प अहवालात घेण्यात आलेल्या गृहीतकांची कसोशीने तपासणी करणे व ह्या बाबींवर स्वतंत्र अभिप्राय (Second opinion) घेण्याची कार्यवाही महामेट्रोने करावी.

१६) सदर प्रकल्पाच्या मंजूर प्रकल्प पुर्णत्व खर्चामध्ये किंमतवाढ, चलन विनिमय दरांतील बदल, प्रकल्पाच्या व्याप्तीमध्ये बदल, डीपीआरमध्ये न दर्शविलेल्या आवश्यक बाबींचा समावेश, प्रकल्प उभारणीच्या विहीत मुदतीमध्ये वा त्यापुढे टाळता येणारा विलंब, अशा करणांमुळे वाढ झाल्यास असा वाढीव खर्च स्थानिक प्राधिकरण, शासकीय/निम शासकीय संस्था त्यांच्याकडील जमिनी (डीपीआरमध्ये दर्शविलेल्या जमिनीव्यतिरिक्त) उपलब्ध करून घेऊन अशा जमिनीचे विकसन करून टीओडी, एफएसआय व इतर अनुषंगिक माध्यमातून निर्माण होणा-या आर्थिक स्त्रोतामधून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१७) सदर प्रकल्पाच्या खर्चात कोणत्याही कारणाने वाढ झाल्यास, सदर वाढीचा संपूर्ण भार/दायित्व महामेट्रो व पुणे महानगरपालिका यांनी वहन करावा.

१८) मेट्रो रेल्वे बांधकाम कालावधी दरम्यान सदर मेट्रो मार्गालगतच्या शासकीय व निमशासकीय संस्थांच्या मोकळया जागांचा तात्पुरता वापर करण्यासाठी तसेच संबंधित विभागांनी सदर मोकळया जागा महामेट्रोला नाममात्र दराने उपलब्ध करून देण्यास संबंधित विभागांना निर्देश देण्यात येत आहेत.

१९) सदर प्रकल्पाच्या बांधकामासाठी सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये दर्शविण्यात आलेल्या मेट्रो मार्गालगत कायमस्वरुपी आवश्यक असलेल्या जमिनी पुणे महानगरपालिका व इतर संबंधित शासकीय/निमशासकीय संस्थानी प्रचलित शासन नियमानुसार महामेट्रोला हस्तांतरित करावी.

२०) सदर प्रकल्पाच्या खर्चात भूसंपादन, पुनर्वसन व पुनर्वसाहतीकरण यामधील विलंबामुळे वाढ होणार नाही याची दक्षता पुणे महानगरपालिका व महामेट्रो यांनी घ्यावी.

२१) सोबतच्या **परिशिष्ट-४** मध्ये नमूद केल्याप्रमाणे "समर्पित नागरी परिवहन निधी" च्या उभारणीस आणि इतर स्त्रोतामधून उपलब्ध झालेला निधी "समर्पित नागरी परिवहन निधी" मध्ये जमा करुन तो निधी सदर प्रकल्पासाठी घेतलेल्या कर्जाची परतफेड, कार्य व देखभाल (O&M), भविष्यात येणाऱ्या पायाभूत सुविधा प्रकल्पाच्या अंमलबजावणी करण्यासाठी इ. साठी महामेट्रोने वापरण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२२) सदर मेट्रो रेल प्रकल्पाच्या बांधकाम खर्चात अवाजवी वाढ होणार नाही याची महामेट्रो व पुणे महानगरपालिका यांनी दक्षता घेऊन प्रकल्पाची उभारणी विहित मुदतीत करावी.

**०३.** हा शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.२३०/१४४४ दिनांक ०५/०४/२०२२ व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.१४७/व्यय-३ दिनांक १०/०५/२०२२ अन्वये प्राप्त अभिप्राय तसेच दिनांक २०/०४/२०२२ रोजी पार पडलेल्या मा. मंत्रीमंडळ बैठकीतील निर्णयास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

**०४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०५१२१०५०३८२८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.05.12 16:12:21 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उपसचिव, महाराष्ट्र राज्य**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. मा. मंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. मा. राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०.अपर मुख्य सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११.अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२.प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३.प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४.प्रधान सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५.प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१६.प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१७.प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१८.प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१९.सचिव (विशेष प्रकल्प), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२०.सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२१.महानगर आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे.
२२.व्यवस्थापकिय संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. (महामेट्रो) नागपूर/पुणे.
२३.आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे.

२४. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२५. पोलिस आयुक्त, पुणे.
२६. महाव्यवस्थापक, पुणे महानगर परिवहन महामंडळ मर्यादित, पुणे.
२७. सह सचिव, नगर रचना, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२८. संचालक, नगर रचना, मध्यवर्ती प्रशासकीय इमारत, पुणे.
२९. उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३०. उप सचिव (नवि-२२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३१. निवड नस्ती (नवि-७).

(नगर विकास विभाग शासन निर्णय क्रमांक : पीआरडी-३३२१/प्र.क्र.७०/नवि-७, दिनांक १२ मे, २०२२ चे सहपत्र)

## परिशिष्ट १

## स्वारगेट ते कात्रज (कॉरिडोर क्र.२ए) या पुर्णतः भूयारी मेट्रो रेल प्रकल्पाची ठळक वैशिष्ट्ये

**१) सदर प्रकल्पाचा कार्यकारी वृत्तांत (Executive Summary) पुढील प्रमाणे आहे:-**

| अ.क्र. | तपशील | |
|---|---|---|
| १. | स्टँन्डर्ड गेज | १४३५ मि.मी. |
| २. | मार्गाची एकूण लांबी | ५.४६४ कि.मी. (भुयारी) |
| ३. | एकूण स्थानके | ३ (भुयारी) |
| ४. | प्रस्तावित कार डेपो | विद्यमान रेंज हिल डेपोचे विस्तारीकरण |
| ५. | आवश्यक जमीन | २.६२ हेक्टर |
| ६. | प्रकल्प राबविण्याचा कालावधी | नोव्हेंबर, २०२२ ते एप्रिल, २०२७ |
| ७. | जमिनीची किंमत (मूळ) | १११.३० कोटी |
| ८. | राज्यशासनाचा कर (मूळ) | १७३.५६ कोटी |
| ९. | केंद्रशासनाचा कर (मूळ) | २०३.४० कोटी |
| १०. | प्रकल्पाची मूळ किंमत<br>(जमिन व सर्वकरांसहीत) | ३१०७.४४ कोटी |
| ११. | दरवाढ | ५१३.०४ कोटी |
| १२. | बांधकाम दरम्यानचे व्याज (IDC) | ३०.३० कोटी |
| १३. | प्रकल्प पूर्णत्वाची किंमत | ३६५०.७८ कोटी |
| १४. | वित्तीय अंतर्गत परतावा दर मालमत्ता विकासासह (FIRR) | १४.४४% |
| १५. | आर्थिक परतावा दर (EIRR)<br>(प्रकल्प पूर्णत्वाच्या आधारे) | १९.८०% |
| १६. | प्रवासी क्षमता<br>(३ डब्यांची मेट्रो रेल गाडी) | १. ६ प्रवासी प्रतिवर्ग मीटर प्रमाणे : ७६४ प्रवासी क्षमता.<br>२. ८ प्रवासी प्रतिवर्ग मीटर प्रमाणे : ९७५ प्रवासी क्षमता. |

**२) प्रवाशी वाहतुकीचा अंदाज:-**

| वर्ष | कमाल PHPDT | दैनंदिन प्रवासी वाहतूक | कमाल PHPDT | दैनंदिन प्रवासी वाहतूक |
|---|---|---|---|---|
| | निगडी ते स्वारगेट | | निगडी ते कात्रज | |
| २०२७ | १६,६१० | ५.७३ लक्ष | १८,०७० | ६.६८ लक्ष |
| २०३७ | २१,३०० | ७.३० लक्ष | २२,९८० | ८.८८ लक्ष |
| २०४७ | २४,८३० | ८.४१ लक्ष | २७,०२० | १०.२८ लक्ष |

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.05.12 16:12:41 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उपसचिव, महाराष्ट्र राज्य**

## परिशिष्ट-२

### १) सदर प्रकल्पाच्या अंदाजित भांडवली खर्चाचा तपशीलः-

| Sr.No. | Description | Total Cost (Rs. Crore) |
|---|---|---|
| **1.** | Alignment & Formation | |
| a. | Underground Section – Twin Tunnel | 1052.10 |
| b. | Viaduct for Stabling Line/Depot | 37.63 |
| **2.** | Station Buildings | |
| a. | Station Building – Cut & Cover | 570.00 |
| b. | E&M tunnel ventilation (Including Lift and Escalator) | 169.51 |
| c. | Ventilation Shaft between station 2 & station 3 | 50.00 |
| 3. | Stabling Lines | 11.72 |
| 4. | P-Way for main line and stabling/depot | 47.47 |
| 5. | Traction and Power Supply | 147.28 |
| 6. | Signaling | 54.06 |
| 7. | Telecommunication | 15.36 |
| 8. | Rolling Stock | 162.73 |
| 9. | Platoform Screen Doors (PSD) | 10.17 |
| 10. | Multi Modal Integration | 10.17 |
| 11. | Cost of Security | 1.25 |
| 12. | Environment cost | 3.32 |
| 13. | Utility Shifting | 37.05 |
| 14. | Total Cost at July 2021 price level (Excluding Land, R&R, General Charges, Contingencies, Central & State Taxes) | **2379.72** |
| 15. | General Charges @5% | 118.99 |
| 16. | Contingencies @ 3 % on all items except land and R&R | 74.96 |
| 17. | Total Cost at July 2021 price levels incl. General Charges and Contingencies (Excluding Land, R&R, Central & State Taxes) | 2573.67 |
| 18. | Central and State Taxes @ July 2021 Price Level | 376.96 |
| 19. | Total Cost incl. General Charges, Contingencies, Land, R&R, Central and state Taxes @ July 2021 Price Levels | 2950.62 |
| 20. | Land cost | 111.30 |
| 21. | R & R | 45.52 |
| 22. | Total Cost incl. General Charges, Contingencies, Taxes @ July 2021 Price Levels (including Land, R&R) | **3107.44** |
| 23. | Escalation @ 5% per annum on the above | 513.04 |
| 24. | Total Completion Cost incl. Land and R&R Costs | 3620.48 |
| 25. | Interest During Construction (IDC) | 30.30 |
| 26. | Total Completion Cost Including IDC | 3650.78 |
| 27. | PPP component (AFC) including escalation & taxes | 17.26 |
| 28. | **Total Completion Cost** | **3668.04** |

## २) एकूण खर्चाचा तपशील : -

| अ.क्र. | तपशील | रक्कम (रु. कोटीत) |
|---|---|---|
| १ | एकूण स्थापत्य कामाची किंमत | १७९०.४८ |
| २ | एकूण प्रणालीची किंमत | ५८९.२६ |
| ३ | एकूण आराखड्याच्या कामासाठी लागणारी किंमत (Design Charges) | ११८.९९ |
| ४ | आकस्मिक शुल्क | ७४.९६ |
| ५ | एकूण केंद्र शासन कर | २०३.४० |
| ६ | एकूण राज्य शासन कर | १७३.५६ |
| ७ | बांधकाम दरम्यानचे व्याज (IDC) | ३०.३० |
| ८ | एकूण जमीनीची व पुनर्वसनची किंमत | १५६.८२ |
| ९ | दरवाढ | ५१३.०१ |
| १० | पीपीपी घटक (AFC) | १७.२६ |
| | **एकूण प्रकल्प पूर्णत्वाची किंमत** | **३६६८.०४** |

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.05.12 16:12:56 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उपसचिव, महाराष्ट्र राज्य**

## परिशिष्ट -३

**प्रकल्प पुर्णत्व खर्चाचा वित्तीय सहभाग आराखडा:-**

| अ.क्र. | तपशिल | रक्कम (रु . कोटी) | सहभागाची टक्केवारी |
|---|---|---|---|
| १ | केंद्र शासनाचे अनुदान | ३००.६३ | १०% |
| २ | पुणे महानगरपालिकेचे अनुदान | ४५०.९५ | १५% |
| ३ | राज्य शासनाचे अनुदान | ४५०.९५ | १५% |
| ४ | द्विपक्षीय, बहुपक्षीय संस्थांचे कर्जसहाय्य | १८०३.७९ | ६०% |
| | केंद्र शासनाच्या अनुदानाकरिता पात्र प्रकल्प खर्च | **३००६.३१** | **१००%** |
| ५ | राज्य कर (SGST) व केंद्रीय कर (CGST) साठी राज्य शासनाचे दुय्यम कर्ज | ४४०.३२ | |
| ६ | भुमि संपादन, बांधकाम दरम्यान व्याज, पूर्नवसन व पूर्नवसाहतीकरण करीता पुणे महानगरपालिकाचे अंशदान | २०४.१४ | |
| ७ | पीपीपी घटक | १७.२६ | |
| एकूण प्रकल्प पुर्णत्व खर्च | | **३६६८.०४** | |

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.05.12 16:13:10 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उपसचिव, महाराष्ट्र राज्य**

**परिशिष्ट -४**

**स्वारगेट ते कात्रज (कॉरिडोर क्र.२ए) मेट्रो प्रकल्प राबविण्याकरीता लागणारा निधी उभारण्याचे इतर विविध स्रोत:-**

सदर प्रकल्पाकरीता इतर निधी उभारण्याचे स्त्रोत खालीलप्रमाणे प्रस्तावित करण्यात येत आहेत:-

अ. मेट्रो मार्गिकांच्या दोन्ही बाजूस ५०० मी. अंतरापर्यंत येणाऱ्या जमिनीवर, अधिमूल्य आकारुन अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक (एफ.एस.आय.) देण्याची तरतूद विकास नियंत्रण नियमावलीत करुन त्यानुसार अधिमूल्याची रक्कम संबंधित क्षेत्रातील नियोजन प्राधिकरणाने वसूल करणे व अशा वाढीव चटईक्षेत्र निर्देशांकापोटी वसूल केलेल्या अधिमूल्याच्या रक्कमेपैकी ५०% रक्कम सदर मेट्रो प्रकल्पाकडे वर्ग करणे.

ब. महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ च्या तरतूदींनुसार महत्वपूर्ण नागरी वाहतूक प्रकल्प राबविण्यात येणाऱ्या शहरात विकास शुल्कात १००% पर्यंत वाढ करून आकारण्याविषयी कायद्यातील तरतूदीनुसार पुणे महानगरपालिका क्षेत्रात वसूल होणाऱ्या रक्कमेमधून उचित हिश्श्याची रक्कम सदर मेट्रो प्रकल्पाकडे वर्ग करणे.

क. महत्वपूर्ण नागरी वाहतूक प्रकल्प राबविण्यात येणाऱ्या शहरात मालमत्तेचे मुद्रांक शुल्कासोबतच १ टक्के अधिभार लावण्याची तरतूद सन २०१५ चा अधिनिमय क्र.३७ दिनांक २१.०८.२०१५ अन्वये महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमचे कलम १४९ मध्ये सुधारणा करण्यात आली आहे. याद्वारे पुणे महानगरपालिका क्षेत्रात वसूल होणाऱ्या रक्कमेमधून उचित हिश्श्याची रक्कम सदर प्रकल्पासाठी वर्ग करणे.

ड. मेट्रो कार डेपोच्या जागेचे वाणिज्यिक विकसनाव्दारे प्राप्त होणारे उत्पन्न प्रस्तुत प्रकल्पासाठी वापरणे.

इ. मेट्रो रेल्वे प्रकल्पाच्या आगमन/निर्गमन ठिकाणी, स्थानकांच्या नावांचे ब्रँडींग, डेपो, स्थानकांवरील जाहिरात व पार्कींगपासून मिळणारे उत्पन्न या प्रकल्पासाठी वापरणे इ.

सदर विविध स्त्रोतांतून प्राप्त होणारा निधी हा एका "समर्पित नागरी परिवहन निधीमध्ये" जमा करावयाचा असून तो निधी सदर प्रकल्पासाठी घेतलेल्या कर्जाची परतफेड, कार्य व देखभाल (O&M), भविष्यात येणाऱ्या पायाभूत सुविधा प्रकल्पाच्या अंमलबजावणी करण्यासाठी इ. साठी महामेट्रोने वापरावयाचा आहे.

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.05.12 16:13:24 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उपसचिव, महाराष्ट्र राज्य**

****